एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये सुधारणा करण्यासाठी अभ्यास गट गठीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-०३२४/प्र.क्र.३७/प्रशि १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००३२.
दिनांक: २२ एप्रिल , २०२४.

**वाचा -**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ,दि. २०.१.२०१४.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दि.२१.०७.२०१७.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन- १११७/ प्र.क्र.६६/सीपीटीपी,दि.०५.१२.२०१७.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-०७१८/प्र.क्र.३७/सीपीटीपी,दि.१३.०८.२०१८ व दि.०६.१०.२०२१.
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग़ क्र. . टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी,दि. २९.११.२०१८ व शासन शुध्दीपत्रक दिनांक १३.१२.२०१८.
६. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी,दि. २०.०५.२०२१.
७. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी,दि. १९.०५.२०२२.
८. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०८२२/प्र.क्र.५८/सीपीटीपी,दि. १३.०९.२०२२.
९. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी,दि. २९.०१.२०२४.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे शासनसेवेत नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांमध्ये संघभावना निर्माण होऊन, त्यांच्यात मैत्रीपूर्ण व सौहार्दाचे नाते निर्माण व्हावे व त्यांची सर्वव्यापक जडणघडण व्हावी, यासाठी अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांप्रमाणे राज्यसेवेतील अधिकाऱ्यांसाठी दोन वर्ष कालावधीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) सुरु करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय उपरोक्त वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयामधील तरतूदींना अनुसरुन,महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्यसेवा परीक्षेद्वारे शिफारसप्राप्त उमेदवारांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण देण्यात येते. सद्य:स्थितीत उक्त कार्यक्रमामध्ये ३३ संवर्गांचा समावेश आहे.

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या राज्य प्रशिक्षण कृती दलाच्या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये सुधारणा करण्यासाठी अभ्यास गट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे शासनसेवेत नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांना सन २०१४ पासून प्रशिक्षण देण्यात येते. सदर कार्यक्रमांतर्गत सीपीटीपी १ ते सीपीटीपी ७ या तुकड्यांचे प्रशिक्षण पूर्ण झाले असून सीपीटीपी ८ व सीपीटीपी ९ या तुकड्यांचे प्रशिक्षण यशदा, पुणे व वनामती, नागपूर येथे सुरू आहे. या कार्यक्रमामध्ये

प्रशिक्षणादरम्यान आलेल्या अनुभवांचा सर्वांगीण विचार करून सदर कार्यक्रमातील संवर्गनिहाय अभ्यासक्रम, प्रशिक्षण पद्धती, प्रशिक्षणार्थींना द्यावयाची सूट, परिक्षा पद्धत, पदव्युत्तर पदवी परीक्षा नियोजन व सदर कार्यक्रमांतर्गत विद्यापीठाची भूमिका, इ. बाबींचा अभ्यास करून त्यामध्ये सुधारणा करण्याच्या अनुषंगाने खालील अभ्यास गट गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अभ्यास गटात खालील प्रमाणे सदस्यांचा समावेश राहील:-

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील अध्यक्ष /सदस्य |
|---|---|---|
| १. | महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे | अध्यक्ष |
| २. | परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत समाविष्ट संवर्गाशी संबंधित प्रशासकीय विभागाचे सह सचिव / उप सचिव | सदस्य |
| ३. | उप सचिव (प्रशिक्षण), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ४. | संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, नागपूर | सदस्य |
| ५. | संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, नागपूर | सदस्य |
| ६. | संचालक (सीपीटीपी), यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे | सदस्य सचिव |

सदर अभ्यास गटाने शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून दोन महिन्याच्या कालावधीत वर नमूद केल्याप्रमाणे एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करावयाच्या सुधारणांच्या अनुषंगाने अहवाल/शिफारशी अ.मु.स. (सेवा) यांना सादर कराव्यात. सदर शिफारशी अंतिम करुन त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये सुधारणा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२२११४६१०१६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.04.22 11:58:30 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (महसूल/ गृह/ ग्राम विकास/ वित्त/ सहकार/ नगर विकास/ राज्य उत्पादन शुल्क/ परिवहन/ सामान्य प्रशासन/ शालेय शिक्षण/कौशल्य विकास व उद्योगकता/ उद्योग ऊर्जा व कामगार).
६. सह सचिव / उप सचिव (महसूल/ गृह/ ग्राम विकास/ वित्त/ सहकार/ नगर विकास/ राज्य उत्पादन शुल्क/ परिवहन/ सामान्य प्रशासन/ शालेय शिक्षण/कौशल्य विकास व उद्योगकता/ उद्योग ऊर्जा व कामगार).
७. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
९. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
११. कार्यासन अधिकारी, प्रशि - ४, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२. निवडनस्ती कार्यासन - प्रशि - १, प्रशि - २ व प्रशि - ३, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.